विविध राज्य संरक्षित स्मारकांच्या जतन व दुरुस्ती कामांना वित्तीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२५/प्र.क्र.६५/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१ मे, २०२५

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२३/प्र.क्र.२२३/सां.का.३, दि.१५ जानेवारी, २०२४
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२३/प्र.क्र.१९२ /सां.का.३ दि.२३ मे, २०२३
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२५/प्र.क्र.६५/सां.का.३ दि.३१ मार्च, २०२५

**प्रस्तावना :-**

विविध राज्य संरक्षित स्मारकांच्या जतन व दुरुस्ती कामांना उपर्निर्दिष्ट क्र.१ ते २ येथील शासन निर्णयांन्वये प्रशासकीय मान्यता/सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार वेळोवेळी सदर कामांना निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. उपर्निर्दिष्ट क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, तांत्रिक कारणास्तव संगणक प्रणालीवर विहित वेळेत बीडीएस न निघाल्याने सदर निधी अखर्चिक राहिला. आता, सदर स्मारकांच्या कामाकरीता एकूण ₹४,२४,६०,६८१/- इतक्या रकमेच्या देयकांना वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये खालील नमूद राज्य संरक्षित स्मारकांच्या कामांसाठी येणाऱ्या एकूण रु.४,२४,६०,६८१/- (अक्षरी रुपये चार कोटी चोवीस लक्ष साठ हजार सहाशे ऐक्याऐंशी मात्र) इतक्या रकमेच्या देयकांना वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | राज्य संरक्षित स्मारकाचे नाव/ प्रस्ताव | सध्या द्यावयाची वित्तीय मान्यता |
|---|---|---|
| १ | कालिका देवी मंदिर, शिरुर, जि.धुळे | ₹२,०१,८५,१२३/- |
| २ | दिल्ली वेस, कारंजा लाड, ता.कारंजा, जि.वाशिम | ₹२,२२,७५,५५८/- |

२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची असेल.

३. हा शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) “अ” नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयास वित्त विभाग अनौ.सं.क्र.३३९/व्यय-१५, दि.०९ मे, २०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

४. यासाठी होणारा खर्च पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग मागणी क्र. क्र. झेडडी-२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०२) पुरातत्वशास्त्र संचालनालय (राज्य) (अनिवार्य) (२२०५ १३३८) २७-लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि.०७ एप्रिल, २०२५ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५२११४४६१५९४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARSRAM NANDRAM BAHURE

Digitally signed by PARSRAM NANDRAM BAHURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ef62741544bc4d8832eecfb2b7ea295e8a6fcdfe9faffcfda201c87e1c73881b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5FD2A6873F4AE5B1D9EA7DD52E449E02A942EA90145BAEAB72C63CED6D659844, cn=PARSRAM NANDRAM BAHURE
Date: 2025.05.21 14:49:21 +05'30'

**( परसराम न.बहुरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहाय्यक संचालक, पुरातत्व विभाग, (रत्नागिरी, पुणे, छत्रपती संभाजीनगर, नांदेड, नागपूर)
६. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, (रत्नागिरी, पुणे, छत्रपती संभाजीनगर, नांदेड, नागपूर)
११.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती, सां.का.३.